20150204124633102

वागजवाडी लघुपाटबंधारे तलाव,
ता.भोर, जि पुणे योजनेस,
सुधारित प्रशासकीय मान्यता
प्रदान करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र. सुप्रमा १००९/(१०३/२००९) ल.पा.१
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक- २८ नोव्हेंबर २०११

**पहावे** : कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे जा.क्र.मकृखोविम/२०९/(२५१/२००९)/लपा-२/३१७८, दि.२०.५.२००९ चे पत्र.

**प्रस्तावना :**

पुणे जिल्ह्यातील वागजवाडी लघु पाटबंधारे तलाव, या योजनेस शासन निर्णय क्रमांक लपात/ /१०८१/१६७२/(४०३/९१)/लपा-१, दिनांक १८/९/१९९२, अन्वये रु.१,२४,३७,७५४/- लक्ष इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यांत आली होती. तद्नंतर मार्च १९९९ मध्ये योजनेच्या कामास प्रत्यक्ष सुरुवात करण्यांत आली आहे.

प्रकल्पाचे काम सुरु असतांना दरसूचीच्या दरातील वाढ, जादा दराची निवीदा स्वीकृती, संकल्पनातील बदल, भूसंपादन खर्चातील वाढ व इतर कारणांमुळे तसेच किंमतीत झालेल्या वाढीमुळे सन २००७-२००८ ची दरसूची वापरुन सुधारित अंदाजपत्रक तयार करुन रु ४७२.७० लक्ष किमतीस सुधारित प्रशासकीय मान्यता मिळणे बाबतचा प्रस्ताव कार्यकारी संचालक, महारागष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे कडून शासनास प्राप्त झाला होता व तो शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावासंदर्भात शासनानं पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय

१) पुणे जिल्ह्यातील वागजवाडी लघु पाटबंधारे तलाव या योजनेस प्रकल्पाचे काम भौतिकदृष्ट्या पूर्ण झालेले असल्याने पूर्णत्व अहवाल करण्याचे दृष्टीने सन २००७-०८ च्या दरसूचीवर आधारित केलेल्या सुधारित प्राक्कलनानुसार कामाच्या रु.४७२.७० लक्ष (रुपये चार कोटी, बाहत्तर लक्ष सत्तर हजार, फक्त.( त्यापैकी रु.४३७.१० लक्ष कामाप्रीत्यर्थ व रु.३५.६० लक्ष अनुषंगिक खर्च)एवढया अंदाजपत्रकीय रकमेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. अंदाजित किंमतीचा गोषवारा सोबत जोडलेल्या विवरणपत्रात देण्यात आला आहे.

२)	या योजनेच्या कामावरील खर्च मुख्य लेखाशिर्ष मागणी आय ५ "४७०२, लहान पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च-१९०, सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रमा यांतील गुंतवणुका (००)(०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ भाग भांडवली अंशदान (योजनांतर्गत) (४७०२ ४७९४) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यांत यावा.

जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण १०९९/(१२६/९९)/मो.प्र.(प्र.), दि.१८.५.९९ मधील तरतूदीनुसार व व आंतरवित्त सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने तसेच सदर निर्णयास नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. २३२/का. १४३४ दि.३०/८/२०११ आणि वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.३०९/व्यय १२ दि.१९/९/२०११ अन्वये सहमती प्राप्त झाली आंहे. या योजनेस प्रदान केलेली सुधारित प्रशासकीय मान्यता अ.क्र. ८e /२०११ वर नोंदविण्यांत आलेली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

( मिलिंद हरदास )
शासनाचे कार्यासन अधिकारी

प्रत अंदाजित किंमतीच्या गोषवाऱ्यासह :-

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपुर
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
मुख्य अभियंता (जसं.), जलसंपदा विभाग, पुणे
आंतर वित्त सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे
उपसचिव (लपा)/उपअभियंता(लपा-१), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासन अर्थ १-२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी पुणे, पुणे.
स्वीय सहायक, मा.मंत्री, जलसंपदा (कृष्णा खोरे विकास महामंडळ), मंत्रालय, मुबई
स्वीय सहायक, मा.राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क, महासंचालक, मंत्रालय, मुंबई
ल.पा.१ कार्यासन संग्रहार्थ

(शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र सुप्रमा १००९/(१०३/२००९) ल.पा.१, दि. २८ नोव्हें ~~ऑक्टोबर~~,२०११ चे सहपत्र)

**विवरण पत्र**

वागजवाडी ल.पा.त. ता. भोर जि. पुणे

अंदाजित किंमतीचा उपशीर्षनिहाय गोषवारा

| अ.क्र. | उपशिर्ष | किंमत (रु. लक्ष) |
|---|---|---|
| १. | अ - प्राथमिक | २१३१६ |
| २. | ब - भु संपादन | ८१०९९९६ |
| ३. | सी - कामे | २८८१५५४९ |
| ४ | डी - विमोचक | १२९०६७२ |
| ५. | के - इमारत | १०००१० |
| ६ | एम-वनीकरण | ३०००० |
| ७ | ओ-संकीर्ण | ३२८७२ |
| ८ | पी - देखभाल | ५०००० |
| ९ | आर - दळणवळण | ५०००० |
| १० | कालवा व वितरीका | ५२०९२६० |
|  | एकूण | ४३७०९६६५ |
| ८. | इ.टी.पी (१० %) | ३५५९९६७ |
|  | एकूण | ४७२६९६६२ |

**ठळक वैशिष्टे**

१. योजनेची सिंचन क्षमता - २७३ हेक्टर

२. नियोजित पाणी साठा - १६६५ स.घ.मी.

३. पाणी साठ्याची प्रती स.घ.मी किंमत - रु. २८३९०/-स.घ.मी.< मापदंड ३३००१/ स.घ.मी.

४. लाभव्यय गुणोत्तर - २.४४ > १.००